**श्री. नरेश पडवळ, लिपीक-टंकलेखक यांना मिरा-भाईंदर महानगरपालिकेतून कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेत कायमस्वरूपी बदलीने सामावून घेणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः- मिभाम-१२२४/VIP-७२२३/प्र.क्र.१२/नवि-२८**
मुख्य इमारत (४ था मजला), मंत्रालय,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- १२ जून, २०२४

**संदर्भ**:- १) श्री. नरेश पडवळ, लिपिक-टंकलेखक, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचा दि.१२.०६.२०२३ रोजीचा अर्ज.
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मनपा/आस्था/१४०४/२०२३-२४, दि.२४.०८.२०२३
३) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र. साप्र.मुका./प्र.क्र.७५६/२०२३/ ई-१८२८७२/२९७०, दि.०६.११.२०२३

## शासन आदेश

श्री. नरेश श्रीराम पडवळ, लिपिक-टंकलेखक, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचेकडून संदर्भीय क्र. १ अन्वये त्यांच्या कौटुंबिक अडचणीस्तव कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेमध्ये कायमस्वरूपी बदली करणेबाबत विनंती पत्र प्राप्त झाले आहे. तसेच, संदर्भ क्र. २ व ३ अन्वये आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका व आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र प्राप्त झालेले आहेत. संदर्भाधीन पत्रांच्या अनुषंगाने श्री. नरेश श्रीराम पडवळ, लिपिक-टंकलेखक, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांची कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेमध्ये कायमस्वरूपी बदलीने नियुक्तीस एक विशेष बाब म्हणून खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**अ)** पदोन्नतीने भरण्यात येणाऱ्या पदांवर बदलीने नियुक्ती करण्यात येणार नाही. फक्त नामनिर्देशनाने नियुक्तीकरिता राखून ठेवण्यात आलेल्या पदांवर बदलीने नियुक्ती करण्यात यावी.

**ब)** अशी नियुक्ती झाल्यानंतर, त्या पदधारकाची ज्येष्ठता नियुक्तीच्या दिनांकास त्या पदाच्या संवर्गात सर्वात कनिष्ठ (Zero Seniority) राहील.

**क)** या प्रकरणी मिरा-भाईंदर महानगरपालिका व कल्याण-डोंबिवली महानगरपालिका आयुक्त तथा प्रशासक यांनी याबाबत महासभेचा ठराव पारीत करावा.

२. उपरोक्त मंजूरीच्या अनुषंगाने आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी श्री. नरेश श्रीराम पडवळ, लिपिक-टंकलेखक, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांना कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेत रूजू होण्याकरीता कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी. तसेच आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी श्री. पडवळ यांना रूजू करून घेण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२४०६१२१८१७१८७९२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2024.06.12 18:30:52 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. नरेश श्रीराम पडवळ, लिपिक-टंकलेखक, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जि. ठाणे.

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त तथा प्रशासक, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जि. ठाणे.
३) आयुक्त तथा प्रशासक, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जि. ठाणे.
४) प्रधान सचिव (नवि २), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
५) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
६) निवडनस्ती (नवि-२८)